**चंद्रपूर जिल्हा दारुबंदीनंतर वर्धा, गडचिरोली व चंद्रपूर या तीन जिल्ह्यांमध्ये दारुबंदीची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण केलेल्या २२ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीटीई ३६१८/प्र.क्र.५०/पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र. अेपीओ-२७१७/प्र.क्र.४७/पोल-३, दि.१२.०७.२०१७.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.०८.०१.२०१८.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि. ०५.०३.२०१८.
४) सहायक पोलीस महानिरीक्षक (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/दारुबंदी/२२ पदे/मुदतवाढ/१०/२०१८, दि. ०२.०४.२०१८.
५) सहायक पोलीस महानिरीक्षक (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/दारुबंदी/२२ पदे/मुदतवाढ/१०/२०१८, दि. ३१.०८.२०१८.
६) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि. ०७.०९.२०१८.

**शासन निर्णय :-**

चंद्रपूर जिल्हा दारुबंदीनंतर वर्धा, गडचिरोली व चंद्रपूर या तीन जिल्ह्यांमध्ये दारुबंदीची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी वर्धा, गडचिरोली व चंद्रपूर या तीन दारुबंदी केलेल्या जिल्ह्यांचा मिळून निर्माण होणाऱ्या प्रभागाकरीता पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवर खालील तक्त्यात नमूद पोलीस अधिकारी/कर्मचारी यांची २२ पदे निर्माण करण्यास उपरोक्त संदर्भाधिन क्र.०१ येथे नमूद दिनांक १२.०७.२०१७ च्या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात आली आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १. | अपर पोलीस अधीक्षक | ०१ |
| २. | पोलीस निरीक्षक | ०३ |
| ३. | पोलीस उपनिरीक्षक | ०६ |
| ४. | पोलीस शिपाई | ०८ |
| ५. | पोलीस शिपाई (चालक) | ०४ |
| | **एकुण पदे** | **२२** |

२. आता पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवर उपरोक्त तक्त्यात नमूद केलेल्या एकूण २२ अस्थायी पदांना **दिनांक ०१ जानेवारी, २०१८ ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०१९** पर्यंत खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१) सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त पदे वगळून उर्वरित पदांना मुदतवाढ देण्यात यावी. तसेच पदे ज्या कारणास्तव ज्या अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर केली आहेत, त्याचे पालन करण्यात यावे.

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १० सप्टेंबर २००१ आणि क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/२००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १९ ऑगस्ट २००४ नुसार पदांच्या आढाव्याची कार्यवाही तातडीने पूर्ण करुन कार्यालयाचा सुधारित आकृतीबंध उच्चस्तरीय सचिव समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबतचा प्रस्ताव तात्काळ शासनास सादर करण्यात यावा.

३) आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेताना शासनाच्या कार्यपद्धतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाचा परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करुन अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा.

४) सदर कालावधीमध्ये कोणत्याही परिस्थितीत पदांचा आढावा उच्चस्तरीय समितीसमोर ठेवून मान्यता घेण्याबाबत वित्त विभागाने संदर्भाधिन क्र.३ दिनांक ०५ मार्च, २०१८ व संदर्भाधिन क्र.६ येथील दिनांक ०७ सप्टेंबर, २०१८ च्या शासन निर्णयानुसार सूचित केलेले आहे. ही बाब विचारात घेता दिनांक २८ फेब्रुवारी, २०१९ अखेर पर्यंत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास, उपरोक्त अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी/ कर्मचारी यांच्या वेतन व भत्याचा प्रश्न निर्माण झाल्यास याबाबतची सर्वस्वी जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहिल.

५) गृह विभागाच्या क्र.सीटीई-३११५/प्र.क्र.२/पोल-३, दिनांक १६ जानेवारी २०१५ च्या पत्रातील माहितीसह मुदतवाढीचा एकच प्रस्ताव सादर करण्यात यावा.

३. उपरोक्त पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन व भत्त्यांवर होणारा खर्च "मागणी क्र.एन-३, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, (१०५) दारुबंदी, (०१) दारुबंदी प्रचार कार्य, (०१) (०१) दारुबंदी प्रचार कार्य (२२३५ ०१०४)-३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो सन २०१७-१८ व सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०८.०१.२०१८, दिनांक ०५.०३.२०१८ व दिनांक ०७.०९.२०१८ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०११०४२८७०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2018.11.01 11:07:21 +05'30'

**( दिनेश सस्ते )**

कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) अपर मुख्य सचिव (राउशु), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई .
८) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
११) जिल्हा पोलीस अधीक्षक, वर्धा/गडचिरोली/चंद्रपूर.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा/गडचिरोली/चंद्रपूर.
१३) सह सचिव (राउशु-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) वित्त विभाग (व्यय-७) / वित्तिय सुधारणा-१.
१५) निवड नस्ती, पोल-३.